तहसीलदार करमाळा यांचे दुय्यम कारागृहातील आरोपींच्या आहार बीलाबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक-एमआयएस-०१९८/१३४/पीआरएस-२.
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक :- १६ ऑक्टोबर,२००२.

वाचा:-१) जिल्हाधिकारी सोलापूर यांचे पत्र क्र.लेखा-५/आरआर ३३२,
दिनांक ३१.१२.१९९७ व क्र.लेखा-५आरआर ५१४/२००२/
दिनांक ५.७.२००२ चे पत्र.तसेच कारागृह महानिरीक्षक महाराष्ट्र राज्य पुणे
यांचे पत्र क्र.संकीर्ण / दुकाकरमाळा / १९९९/४२४/ कक्ष,३
दिनांक ७.८.१९९९.

**शासन निर्णय:** जिल्हाधिकारी सोलापूर यांनी त्यांच्या दिनांक ३१.१२.१९९७ च्या पत्रान्वये तहसीलदार करमाळा यांच्या दुय्यम कारागृहातील आरोपींच्या आहारभत्ताविषयक मार्च १९९२ ते डिसेंबर १९९५ या कालावधीतील रु. ४५,९०७/- इतक्या रक्कमांची देयकांची अदायगी प्रलंबित असून सदर देयके १ वर्षावरील कालावधीची असल्याने त्यास शासनाच्या मंजूरीसाठी प्रस्ताव पाठविलेला होता. सदर देयके ठेकेदाराने रक्कम एकदम मिळण्याच्या दृष्टीने उशीराने सादर केल्याने त्याची अदायगी करण्यास विलंब झाल्याचे जिल्हाधिकारी सोलापूर यांनी कळविलेले आहे. ही बाब विचारात घेता तहसीलदार करमाळा यांच्या दुय्यम कारागृहातील आरोपींच्या आहारभत्ताविषयक मार्च १९९२ ते डिसेंबर १९९५ या कालावधीतील रु. ४५,९०७/- (रुपये पंचेचाळीस हजार नऊशे सात फक्त) इतक्या रक्कमेच्या प्रलंबित देयकांची अदायगी करण्यास शासन मंजूरी देत आहे. जिल्हाधिकारी सोलापूर यांनी त्यांच्या उपरोक्त दिनांक ३१.१२.९७ च्या पत्रासोबत सादर केलेली मूळ देयके त्यांचेकडे यासोबत पाठविण्यात येत आहे. सदर देयकांची अदायगी करताना जिल्हाधिकारी सोलापूर यांनी शासन निर्णय वित्त विभाग, क्र.विअप्र १०००/प्र.क्र.४६/ २००१, दिनांक ११.७.२००१ मधील अनुक्रमांक ६,नियम क्र.४० मधील तरतूदीनुसार सदर देयके कोषागारास सादर करण्यात आली नव्हती. व त्याचे प्रदान करण्यात आले नव्हते, याची खात्री करावी. सदर रक्कमेचा खर्च मुख्यलेखाशीर्ष-२०५६ तुरुंग, (००) (०३) इतर तुरुंग ( २०५६ ००५३ ) या लेखाशीर्षांतर्गत सन २००२-०३ च्या उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

२. हा शासन निर्णय वित्त विभाग, क्र.विअप्र १०००/प्र.क्र.४६/ २००१/ विनियम दिनांक ११.७.२००१ अन्वये प्रशासकीय विभागाकडे असणाऱ्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(र. ना. माळी)
कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन.

प्रति,

कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक मुख्यालय, पुणे./कारागृह उपमहानिरीक्षक,पश्चिम विभाग,पुणे
जिल्हाधिकारी सोलापूर.
तहसीलदार तथा अधिक्षक , दुय्यम कारागृह करमाळा,जि.सोलापूर.
महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता )(लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य मुंबई / नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर.
निवड नस्ती